उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) आणि उप जिल्हाधिकारी, तहसीलदार व नायब तहसीलदार संवर्गातील अधिका-यांच्या "विशेष विकलांगता रजा" आणि "अध्ययन रजा" या व्यतिरिक्त इतर सर्व प्रकारच्या रजा मंजूर करण्याचे अधिकार संबंधित विभागीय आयुक्त यांना प्रत्यायोजित करण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-३०१६/प्र.क्र.१३९/ई-३**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक: ०३ डिसेंबर, २०१६.

**संदर्भ :-** वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अरजा-२४९३/५९/सेवा-९ दिनांक १६.७.१९९४

**<u>प्रस्तावना</u>**

महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम २७ व २९ च्या तरतुदीनुसार उक्त नियमावलीतील परिशिष्ट-एक च्या अ.क्र. ५ प्रमाणे **अराजपत्रित कर्मचाऱ्यांच्या** "विशेष विकलांगता रजा" आणि "अध्ययन रजा" या व्यतिरिक्त इतर सर्व प्रकारच्या रजा मंजूर करण्यासंदर्भात पूर्ण अधिकार नियुक्ती करण्यास सक्षम असणाऱ्या प्राधिकाऱ्यांना, तसेच उक्त परिशिष्टातील अ.क्र.६ प्रमाणे व संदर्भाधीन शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अरजा-२४९३/५९/सेवा-९ दिनांक १६.०७.१९९४ अन्वये **वर्ग-१ व वर्ग-२ च्या अधिकाऱ्यांच्या** बाबतीत अध्ययन रजा आणि विशेष विकलांगता रजा ह्या व्यतिरिक्त इतर सर्व प्रकरच्या रजा मंजूर करण्यासंदर्भात पूर्ण अधिकार मंत्रालयीन प्रशासकीय विभागाचे सचिव यांना आहेत.

महसूल विभागाच्या नियंत्रणाखालील राजपत्रित अधिकारी/कर्मचारी यांच्या १८० दिवसांपेक्षा अधिक कालावधीच्या रजेबाबतची शासनाकडे प्राप्त होणारी प्रकरणे नियमित प्रशासकीय स्वरूपाची आहेत. प्रधान सचिव (महसूल) यांच्याकडील कामाची व्याप्ती विचारात घेता, प्रशासकीय सुगमता तसेच सर्वसाधारण प्रकरणी सादरीकरणाचे टप्पे कमी करणे व प्रकरणांचा निपटारा जलदगतीने होण्याच्या दृष्टीने, उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी), उप जिल्हाधिकारी, तहसीलदार व नायब तहसीलदार संवर्गातील अधिकाऱ्यांच्या "विशेष विकलांगता रजा" आणि "अध्ययन रजा" या व्यतिरिक्त १८० दिवसांपेक्षा अधिक असलेल्या सर्व प्रकारच्या रजा, सतत ५ वर्षाच्या कमाल मर्यादेच्या अधिन राहून, मंजूर करण्याच्या प्रकरणी "मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुख" म्हणून प्रधान सचिव (महसूल) यांना असलेले अधिकार विभागीय आयुक्त यांना प्रत्यायोजित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी), उप जिल्हाधिकारी, तहसीलदार व नायब तहसीलदार संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विशेष विकलांगता रजा आणि अध्ययन रजा या व्यतिरिक्त १८० दिवसांपेक्षा अधिक असलेल्या सर्व प्रकारच्या रजा, सतत ५ वर्षाच्या कमाल मर्यादेस अधीन राहून, मंजूर करण्याच्या प्रकरणी "मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुख" म्हणून प्रधान सचिव (महसूल) यांना असलेले अधिकार, संबंधित विभागीय आयुक्त यांना या शासन निर्णयाद्वारे प्रत्यायोजित करण्यात येत आहेत.

२. विभागीय आयुक्त यांनी या प्रमाणे प्रत्यायोजित अधिकारांचा वापर करुन उक्त रजा मंजूर करताना अशा रजे संदर्भातील नियम, सर्व प्रचलित शासन निर्णय, तथा वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या आदेशांच्या अधीन राहून सदर रजा मंजूर कराव्यात.

३. उक्त अधिकारान्वये विभागीय आयुक्त यांनी एखाद्या अथवा सर्व प्रकरणी घेतलेल्या निर्णयाबाबत प्रधान सचिव (महसूल) हे "मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुख" म्हणून फेर आदेश देऊ शकतील किंवा सुधारित आदेश देऊ शकतील. तसेच अधिकारांच्या प्रत्यायोजनानंतरही त्यांचे वरील सर्व प्रकरणी निर्णय घेण्याचे अधिकार अबाधित राहतील.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२८७/१६/सेवा-६ दि.१९.८.२०१६ च्या मान्यतेने निर्गमित करण्यांत येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०३१७११२७६५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manu Kumar Srivastava

Digitally signed by Manu Kumar Srivastava
DN: c=IN, o=All India Services, ou=Principal Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manu Kumar Srivastava
Date: 2016.12.03 19:19:06 +05'30'

**(मनु कुमार श्रीवास्तव)**
**प्रधान सचिव (महसूल)**

प्रत,

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राज भवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
३. मा.मंत्री ( महसूल ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -४०००३२
४. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -४०००३२

५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
६. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२
८. प्रधान सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२
९. सर्व विभागीय आयुक्त
१०.सर्व जिल्हाधिकारी
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४.सर्व सह सचिव/उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२
१५.सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२
१६.निवड नस्ती (ई-३), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२